# शेतकऱ्याची तीन मुलं

चैंटल मारोलेस

मराठी: अश्विनी बर्वे



# शेतकऱ्याची तीन मुलं

चैंटल मारोलेस



जेव्हा तिन्ही मुलं मोठी झाली, तेव्हा त्यांच्या वडिलांनी, फ्रैंक यांनी विचार केला, “कदाचित माझ्या मुलांना शेतकरी व्हायचे नाही. त्यांना स्वतःला कळायला हवं की त्यांना काय करायची इच्छा आहे.”



त्यानंतर लगेचच त्यांनी आपला सगळ्यात मोठा मुलगा गॅरीला बोलावलं, आणि म्हटलं, "गॅरी, माझं म्हणणं ऐक. आता तुझी शाळा संपली आहे. मी तुला जगभर प्रवास करण्यासाठी एक वर्ष सुट्टी देत आहे. मला बघायचं आहे की तुला कोण व्हायचं आहे."

गॅरी ओरडला, "व्वा! भारीच! एक वर्षाची सुट्टी! किती चांगली गोष्ट आहे, मी लगेच जाईन."

त्याची आई म्हणाली, "थांब,मी तुझ्यासाठी कापडाच्या दोन पिशव्या तयार केल्या आहेत. एकात मी एक बनियन, एक शर्ट, आणि काही मोजे आणि दुसऱ्यात पोळ्या, पनीर, आणि जॅम ठेवला आहे. एका वर्षानंतर जेव्हा तू परत येशील तेव्हा या दोन पिशव्या परत घेऊन ये, कारण मी त्या मोठ्या कष्टाने शिवल्या आहेत."

गॅरी म्हणाला, "अच्छा! आई,बाबा आणि माझ्या भावांनो!"



गॅरी लगेच निघून गेला. एक पिशवी त्याच्या डाव्या खांद्यावर आणि दुसरी त्याच्या उजव्या खांद्यावर. गॅरी याआधी एवढा खुश कधी नव्हता. आता त्याला गहू आधीपेक्षा अधिक पिवळा, घास जास्त हिरवा आणि आकाश आधीपेक्षा अधिक निळे दिसत होते. पण दोन दिवसानंतर त्याचं सगळं खाणं संपलं. आता गॅरी भुकेला होता.मग त्याने आप आपल्याला म्हणाला, “बघ, उन्हाळा आहे आणि ऊनही खूप पडत आहे. मी काही केक खरेदी करण्यासाठी माझं बनियन विकून टाकतो.”



दोन आठवड्यापर्यंत गॅरीने क्रीम रोल खाल्ले. मग त्याने आपला शर्ट, आपले मोजे आणि आपल्या पिशव्या विकल्या.

जेव्हा त्याचे सगळं काही विकलं गेलं, तेव्हा त्याने काही करण्याचा निर्णय घेतला, पण त्याने शेतात काम केलं नाही. अरे नको! शेतातलं काम फार मेहनतीचं काम आहे.

गॅरी एका धर्मशाळेत गेला आणि त्याने आपल्या ग्राहकांचे मन रमवण्यासाठी आपल्या सुरेल आणि बुलंद आवाजात गाणी गायिली.



त्याने खूप चांगलं गायल्यामुळे आणि तो एक चांगला मुलगा होता, म्हणून त्याला अनेक लग्नात आणि पार्टीमध्ये आमंत्रित केले गेले.

गॅरीला यात एवढी मजा आली की त्याला वेळ कसा गेला हेच कळलं नाही.

एक दिवस, गॅरीने बघितलं की त्याच्या शर्टाला भोकं पडली होती आणि त्याच्या मोज्यांचे फक्त काहीच धागे उरले होते.

तेव्हा गॅरीने आप आपल्याला म्हटले, “आता घरी जाण्याची वेळ आली आहे, याशिवाय मला घर सोडून जवळजवळ एक वर्ष होऊन गेले आहे.”





जेव्हा तो घरी परत आला, तेव्हा त्याची आई त्याला भेटण्यासाठी धावत आली.

"गॅरी, माझ्या बाळा, तू फाटलेले कपडे घातले आहे. आणि कोणीतरी तुझ्या मजबूत पिशव्या पण चोरल्या आहेत."

गॅरी ज़ोरात हसला, "नाही, आई, मी पिशव्या विकून टाकल्या."

"काश तुम्हाला कळलं असतं की मी किती छान वेळ घालवला. मी जिथे जाई तिथं लोक मला गाणं गाण्याची फरमाइश करत. ऐका! मी एक गाणं पण लिहलं आहे.ते मी तुम्हांला ऐकवतो."

पण तेव्हाच त्याचे वडील म्हणाले, "तू गाणं नंतर गा, आता आम्हांला हा घास सुखवायचा आहे."

त्या रात्री अंथरुणावर झोपल्यावर, फ्रैंक आपल्या पत्नीला म्हणाला, “आपला गॅरी निश्चितपणे एक चांगला गायक आहे, तो शेतकरी होऊ इच्छित नाही. उद्या मी ग्रेगला जग प्रवासाला पाठवेन. मग आपण बघू या तो काय करतो ते.”



जेव्हा आईने  ग्रेगला त्याच्या दोन पिशव्या दिल्या, तेव्हा त्याने पाहिलं आणि म्हटलं, “त्या गॅरीच्या पिशव्यांपेक्षा त्या छोट्या आहेत, तू मला अजून एक तिसरी पिशवी पण दे.”

त्याच्या आईने श्वास सोडला, पण तिने अजून एक तिसरी पिशवी शिवली.

ग्रेगने चकित होऊन म्हटलं, “पण ही पिशवी तर रिकामी आहे.”

"अच्छा, ग्रेग!" आई म्हणाली, “तुला नेहमी दुसऱ्यापेक्षा अधिक हवे असते. ठीक आहे, तू काही काजू-बदाम घेऊन जा.”





ग्रेग लगेचच घरातून निघाला, एक पिशवी त्याने डाव्या खांद्यावर, दुसरी त्याच्या उजव्या खांद्यावर आणि तिसरी गळ्यात अडकवली.

एखाद्या शहरात प्रवेश करण्या आधी, ग्रेग फूलं तोडून त्यांचा गुच्छ तयार करत असे आणि आपल्या गलोलने पक्षी मारत असे.

मग त्याने ते विकून एक चौथी पिशवी खरेदी केली.

दहा दिवसानंतर, रस्त्यावर, ग्रेगने पक्षी, कपड़े, केक, खेळणी आणि हत्यारांनी भरलेली आपल्या सर्व नव्या पिशव्या ठेवण्यासाठी एक हातगाडी खरेदी केली.

जसा तो एखाद्या गावात जाई, सगळ्या महिला धावत येत,
“तुमच्याजवळ सुई-दोरा आहे का? पुस्तक आहे का? हुक आहे का? झाडू आहे का?

आणि हो, बिलकुल! ग्रेग आपल्याजवळ सगळं सामान ठेवत असे.



ग्रेगने सर्वकाही सामान आपल्या पंचवीस गोण्यांमध्ये ठेवलं आणि त्या आपल्या गाडीवर लादल्या. त्याच्या उरलेल्या दोन पिशव्या त्याचे गाढव वाहत असे. ग्रेग इतका व्यग्र होता की त्याला वेळ कसा गेला हे कळलेच नाही. आपल्या आई-वडिलांना सोडून त्याचे एक वर्ष एका चुटकीसरशी संपले.



त्याची आई ओरडली, “बघा आपला देखो ग्रेग परत आला आहे! फ्रैंक, आपला मुलगा परत आला आहे! जरा त्याच्या सगळ्या पिशव्या बघ, निश्चितपणे त्याच्याकडे ते फावडे पण असेल ज्याची तुला गरज आहे.”

ग्रेग म्हणाला, “नक्कीच माझ्याजवळ ते फावडे आहे. पण त्याची किंमत सहा डॉलर आहे.”

त्याचे वडील फ्रैंक म्हणाले, “सहा डॉलर? चल आज रात्रीच्या तुझ्या जेवणाचा तेवढाच खर्च येईल. पण आधी इकडे ये आणि गाय दुहायला मदत कर.”



त्या रात्री अंथरुणावर, फ्रँकने आपल्या पत्नीला म्हटले, “आपला ग्रेग एक चांगला व्यापारी होईल, चला चांगलं झालं की त्याला शेतकरी व्हायचं नाही. उद्या जॉर्जला जगभर प्रवास करण्यासाठी निघेल आणि आपण मग बघू.”



आणि दुसऱ्या दिवशी, जॉर्ज घर सोडून निघाला. एक पिशवी त्याच्या डाव्या खांद्यावर, दुसरी उजव्या खांद्यावर होती.

तो एक चांगला दिवस होता आणि चालतांना जॉर्ज शिट्टी वाजवत होता.

लवकरच त्याला एक शेतकरी भेटला,ज्याने म्हटले, “तू खूप भाग्यवान आहे की तुझ्याजवळ फिरण्यासाठी वेळ आहे. मला तर दुपारी जेवायला सुद्धा वेळ मिळत नाही. कारण त्यावेळी मला शेत नांगरायचं असतं.”



जॉर्ज म्हणाला, “माझ्याजवळ दोन माणसांना पुरेल एवढं अन्न आहे, आपण वाटून घेऊ शकतो. मग मी तुम्हांला मदत करेन. अशाप्रकारे मी शेतकऱ्याचे काम पण शिकू शकेल.”

जेव्हा त्यांचे जेवण झाले तेव्हा शेतकरी जॉर्जला आपल्या घरी घेऊन गेला आणि त्याने त्याची रिकामी पिशवी पाव आणि मासाने भरून टाकली.



मग जॉर्ज पुढे गेला. संध्याकाळी त्याने मदतीसाठी कोणीतरी रडत आवाज देत आहे. हे ऐकलं. तो एक म्हातारा माणूस होता, जो एका खड्डात पडला होता.

जॉर्जने त्वरित त्याला बाहेर काढले आणि आपल्या पिशवीतले कपडे त्याला घालायला दिले. जॉर्ज म्हणाला, “जर तुम्ही कपडे बदलले नाही तर थंडी वाजेल.”



शेतकऱ्याने कपडे बदलल्यानंतर जॉर्जला म्हटले,

“जर मी आजारी पडलो तरी फारसे काही बिघडले नसते कारण मला जडीबुटीने बरं कसं करायचं माहित आहे.जर तुला हवं असेल तर मी तुला जडीबुटी ओळखायला आणि त्यापासून औषधे करायला शिकवेन. मग त्या औषधांनी तू तुझी पिशवी भरू शकतो.”





जॉर्जचे दिवस असेच जात होते. तो नेहमी लोकांना देत असे आणि लोक पण त्याला देत असत. म्हणून त्याची एक पिशवी नेहमी रिकामी असे आणि एक नेहमी भरलेली असे.

जार्ज एवढ्या साऱ्या गोष्टी शिकला की लवकरच एक वर्ष निघून गेले. आणि जाहीर आहे जेव्हा घरी गेला तेव्हा त्याच्या साऱ्या पिशव्या भेटवस्तूनी भरलेल्या होत्या.

तेव्हा फ्रेंक आपल्या पत्नीला म्हणाला:

“बघ  प्रिये! आपण किती भाग्यवान आहोत की आपली तिन्ही मुलं चांगली आहेत – गॅरीचा खिसा नेहमी रिकामा असे, पण त्याचे मन नेहमी गाण्यांनी भरलेले असते. एक दिवस तो नक्की मोठा गायक होईल.

ग्रेग नेहमी खूप व्यग्र असतो,तो आळशी नाही आणि एक सफल व्यापरी होईल.

आणि आता जॉर्जकडे बघ. तो एक चांगल्या तयार शेतासारखा आहे. तो नेहमी घेण्यासाठी तयार असतो आणि देण्यासाठी सुद्धा तयार असतो आणि याचा अर्थ आहे की तो एक खरा शेतकरी होईल.”



समाप्त